**<u>नागपूर सुधार प्रन्यास</u>**
**नागपूर सुधार प्रन्यासच्या पब्लिक प्रिसिंक्ट अभिन्यासातील सार्वजनिक उपयोगाचा भूखंड क्र.०८, क्षेत्रफळ १४२० चौ.मी. चे वाटप श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समितीस समाज भवनाचे बांधकाम करण्यासाठी वाटप करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१३/व्हीआयपी-५३४/ नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ जून, २०१७

<u>वाचा :-</u>

१) कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशा.वि./२४०९ दिनांक ०३/१२/२००८
२) कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशा.वि./२५८३ दि.२६/१२/२००८
३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशा वि/२७१४ दिनांक २८/५/२०१४
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशा.वि./६९५२ दिनांक १६/१२/२०१४
५) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशा वि/५९०८ दिनांक १०/०९/२०१५
६) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.प्रशासन विभाग/१००७४ दिनांक ११/०१/२०१६

**<u>प्रस्तावना :</u>**

नागपूर सुधार प्रन्यासच्या पब्लीक प्रिसिंक्ट अभिन्यासातील सार्वजनिक उपयोगाचा भूखंड क्र.०७ आराजी १४२०.०० चौ.मी. चे वाटप श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती, नागपूर या संस्थेला समाज भवनाचे बांधकामाकरिता, नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाचा ठराव क्र.१५/१०६९ (तहकूब) दिनांक ०४/१०/२००८ नुसार मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ मधील नियम क्र.२६ अंतर्गत नियम क्रमांक ५ (२) शिथील करुन वाटप करण्यासाठी नियम २० अन्वये शासनाच्या मंजुरीसाठी संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला होता.

तथापि, सदरहू संस्थेच्या समाजाचा व्याप लक्षात घेता व बांधकाम करण्याच्या दृष्टीने भूखंड क्र.०७ ऐवजी भूखंड क्र.०८ चे वाटप करण्याबाबत संबंधीत संस्थेने, नासुप्रकडे केलेल्या विनंतीस अनुलक्षून श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती, नागपूर या संस्थेच्या नावे पब्लीक प्रिसिंक्ट अभिन्यासातील भूखंड क्र.०७ ऐवजी भूखंड क्र.०८, क्षेत्र १५१६.१६ चौ.मी. चे वाटप करण्यास नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळ ठराव क्र.०३/१०७५/ २९.०४.२००९/का.अ./अ.ब. नुसार शासनाची मंजूरी प्रदान करण्याबाबत संदर्भाधीन क्र.०२ येथील पत्रान्वये कळविण्यात आले होते. त्यानुसार प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.:-

**शासन निर्णय :-**

कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांच्या उपरोक्त संदर्भाधीन प्रस्तावाद्वारे करण्यात आलेल्या विनंतीनुसार, नागपूर सुधार प्रन्यासच्या पब्लीक प्रिसिंक्ट अभिन्यासातील भूखंड क्र.८, क्षेत्र १५१६.१६ चौ.मी. या जागेवर समाजभवनाचे बांधकाम करण्यासाठी श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती, नागपूर या संस्थेला सदरचा भूखंड खालील अटी-शर्तीच्या अधीन राहून ३० वर्षाकरिता देखभाल/ दुरुस्ती आणि व्यवस्थापनाकरिता देण्यास नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ च्या नियम ५ (२) मधील तरतुद, नियम २६ अंतर्गत शासनास असलेल्या अधिकारान्वये शिथीलता देऊन, मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर भूखंड व समाज भवनाची मालकी नागपूर सुधार प्रन्यास यांची राहील.
२. सदर समाज भवनाच्या संदर्भात वापर, देखभाल / दुरुस्ती व व्यवस्थापनाच्या कराराचे ३० वर्षानंतर दोन्ही पक्ष नुतनीकरण करु शकतील.

३. सदर समाज भवनाच्या वापरातून श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती या संस्थेस प्राप्त होणा-या उत्पन्नाच्या विनियोगाबाबत नागपूर सुधार प्रन्यासने निर्णय घ्यावा.या अनुषंगाने नागपूर सुधार प्रन्यास आणि संबंधित संस्था यांच्यामध्ये होणा-या करारानुसार आकारणीबाबत निर्णय घेण्यात यावा.

४. उत्पन्नाच्या हिश्श्याबाबत नागपूर सुधार प्रन्यास व श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती, नागपूर यांनी परस्पर सामंजस्याने नोंदणीकृत करार करावा.

५. उपरोक्त भूखंड / व्यवहाराबाबत भविष्यात काही न्यायालयीन वाद उद्भवल्यास, त्याबाबत शासन जबाबदार राहणार नाही.

६. उपरोक्त भूखंडाच्या अनुषंगाने शासनाचा देय महसूल संबंधित वापर करणा-या संस्थेने वेळोवेळी अदा करावा.

७. बांधण्यात आलेल्या समाज भवनावर श्री.संताजी जगनाडे महाराज स्मारक समिती, नागपूर या संस्थेची मालकी राहणार नाही व या समाज भवनाच्या नामकरणाबाबत नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांच्या प्रचलित नियमानुसार उचित निर्णय घेण्यात यावा.

८. समाज भवन सर्वसामान्य जनतेस ना-नफा-ना-तोटा या तत्वावर खुले ठेवण्याची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील.

९. समाज भवनाचे काम खासदार, स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमांच्या निधीतून झाल्यास, सदर योजनेतील तत्वे, अटी व शर्ती यांचे पालन करण्याची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०६०९१०५१२७८४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.09 10:48:41 +05'30'

**( ज.ना.पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
५) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
६) जिल्हाधिकारी नागपूर, नागपूर
७) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.